राज्य क्रीडा परिषदेमार्फत क्रीडा
संस्थांना सहायक अनुदान
निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निवियो २०१६ /प्र.क्र.२९ /क्रीयुसे -३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : २५ नोव्हेंबर, २०१६.

**वाचा:-**

१) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. राक्रीधो-१०९६/प्र.क्र.३३०/क्रीयुसे-१ दि. ३१ जुलै, १९९७.
२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थसं-३, दि.२० एप्रिल, २०१६.
३) क्रीडा व युवक सेवा पुणे यांचे पत्र क्रमांक .निधी वितरण/प्रस्ताव/त्रुटी पूर्तता/२०१६-१७/का-६/४०९४ दि.१९ ऑक्टोबर, २०१६.

**प्रस्तावना : -**

महाराष्ट्र राज्यात क्रीडा व खेळाच्या विकासासाठी कार्यरत असलेल्या पंजीबध्द क्रीडा संस्था, मंडळे तसेच इतर कार्यक्रमाबरोबर क्रीडा विकासाचे कार्य करणाऱ्या संस्थाना परिशिष्टात नमूद केल्यानुसार महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेच्या निधीतून शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्र. राक्रीधो-१०९६/प्र.क्र.३३०/क्रीयुसे-३ दि. ३१ जुलै, १९९७ अन्वये आर्थिक सहाय्य देण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे सदर उपक्रमाकरीता सन २०१५-१६ मध्ये रु.१२.६० लक्ष अर्थसंकल्पित निधीपैकी खर्च निरंक झालेला असून सदर निधी पुन: शासनखाती जमा करण्यात आला आहे. सन २०१६-१७ या कालावधीत प्रस्तुत योजनेच्या अंमलबजावणीकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.५.०० लक्ष इतक्या तरतुदीपैकी ८० टक्केच्या मर्यादेत रु. ४.०० लक्ष इतक्या निधीच्या वितरणास मान्यता देण्याची बाब या नस्तीच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्यात क्रीडा व खेळांच्या विकासासाठी कार्यरत असलेल्या एकविध खेळाच्या जिल्हा व राज्य संघटना, क्रीडा संस्था, क्रीडा मंडळे तसेच क्रीडा विकासाचे कार्य करणाऱ्या संस्थांना अधिकृत राज्य राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्पर्धेसाठी महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेच्या निधीतून आर्थिक सहाय्य करण्यात येते. यासाठी रु.५.०० लक्ष तरतूद अर्थसंकल्पित आहे. त्यापैकी संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयानुसार रु.४.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्रमांक : ई-३, २२०४ क्रीडा व युवक सेवा-१०४, (०२)(०१) राज्य क्रीडा परिषदेमार्फत क्रीडा संस्थांना सहायक अनुदान (२२०४ १५५१) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या दि.२०/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

३.१ . वित्त विभागाच्या दि.२०/०४/२०१६ च्या शासन परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

३.२. यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

३.३. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत गतवर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

३.४. दि.२४/०७/२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

३.५. परिपत्रकातील "अ" व "ब" ची पूर्तता होत आहे.

४. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २०/०४/२०१६ व दि. २४/०७/२०१५ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२०/०४/२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १,२,३,४,५,६,७ व ८ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११२५१२२७२२६८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Charushila D Chaudhari

Digitally signed by Charushila D Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila D Chaudhari
Date: 2016.11.25 12:29:33 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा )यांचे खाजगी सचिव
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
७. सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा (संचालनालयामार्फत)
८. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी ( संचालनालयामार्फत )
९. निवडनस्ती, क्रीयुसे-३.